**राज्य समन्वय अधिकारी, शालेय पोषण आहार कक्ष यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०१८/प्र.क्र.२१३/एस.डी.-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ०१ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ :-

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक शापोआ-२०११ / प्र.क्र.५३५/ एस.डी.३, दि. ०६ मार्च, २०१७

शासन निर्णय :-

प्राथमिक शिक्षण संचालनालय स्तरावर शालेय पोषण आहार योजनेकरिता दि.०६/०३/२०१७ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या स्वतंत्र कक्षाकरीता **"राज्य समन्वय अधिकारी"** यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथ.) यांनी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन राज्य समन्वय अधिकारी, शालेय पोषण आहार कक्ष, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

यानुषंगाने **"राज्य समन्वय अधिकारी"**, शालेय पोषण आहार कक्ष, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे यांना महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र. १५ (३) अन्वये "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, **"राज्य समन्वय अधिकारी"** यांना शालेय पोषण आहार योजनेचा निधी कोषागारातून आहरित करुन जिल्हयांना वितरीत करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबीपुरतेच मर्यादित राहतील.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दि.१७/०४/२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग एक, अनुक्रमांक तीन येथे नमूद नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यास आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०१११३४५३६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Abaji Patil

Digitally signed by Pramod Abaji Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, cn=Pramod Abaji Patil
Date: 2018.11.02 12:07:12 +05'30'

**( प्रमोद पाटील )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई

६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

७) मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

८) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

१०) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

११) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर

१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१५) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)

१६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई

१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई

१८) निवड नस्ती - एस.डी. ३.